**उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कासारशिरसी या कार्यालयासाठी नियंत्रक अधिकारी, कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२२/प्र.क्र.४२/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०१ मार्च, २०२३.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्र.ईएसटी २०२२/प्र.क्र.४२/प्रशासन-१, दि.३० जानेवारी, २०२३.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर यांचे पत्र क्र.पीडब्लुसी/ आस्था-१/२०२२-२०२३/४३०, दि.१३ फेब्रुवारी, २०२३.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर यांच्या अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर यांच्या अधिनस्त असलेले उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम (इमारती) उप विभाग क्र.२, लातूर हे कार्यालय मंजूर पदांसह कासारशिरसी ता.निलंगा, जि.लातूर या ठिकाणी स्थलांतरीत करुन त्याचे नामाभिदान उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कासारशिरसी करण्यास दि.३०/०१/२०२३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

तथापि, सदर शासन निर्णयान्वये उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कासारशिरसी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित न केल्यामुळे या उप विभागीय कार्यालयात कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांना वेतन व भत्ते अदा करणे सुलभ व्हावे याकरीता उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कासारशिरसी कार्यालयासाठी नियंत्रक अधिकारी, कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर यांनी दि.१३/०२/२०२३ च्या पत्रान्वये विनंती केली होती.

**२.** तद्नुसार उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कासारशिरसी या कार्यालयाकरीता खालीलप्रमाणे नियंत्रक अधिकारी, कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | नियंत्रक अधिकारी | कार्यालय प्रमुख | आहरण व संवितरण अधिकारी |
|---|---|---|---|---|
| १ | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कासारशिरसी | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर | कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर | उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कासारशिरसी |

**३.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०११२४६१८३८१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIKRAM NIVRUTTI DHAMAL

Digitally signed by VIKRAM NIVRUTTI DHAMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=10D36944A4B86EAB516B1B70183709C5FB570CFDF5A52755ADFEF51ED380B836, cn=VIKRAM NIVRUTTI DHAMAL
Date: 2023.03.01 12:51:15 +05'30'

**( विक्रम नि. ढमाळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नांदेड.
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर.
३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, लातूर.
४) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कासारशिरसी.

**प्रत :-**

१) महालेखापाल-१ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल -२ (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर मुख्य सचिव (सा.बां.) / सचिव (रस्ते) / सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४) जिल्हा कोषागार / उप कोषागार अधिकारी, लातूर.
५) कार्यासन अधिकारी, अर्थसंकल्प-१ व अर्थसंकल्प-३, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवडनस्ती.